मासेमारी नौकांवर संदेशवहन मासळीचा शोध घेणे, इ. अत्याधुनिक यंत्रसामुग्री खरेदीसाठी अर्थसहाय्य देण्याची योजना सन २००९-१० मध्ये राबविण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - मत्स्यवि-१००९/प्र.क्र.११२/पदुम-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१०

वाचा : १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक : मत्स्यवि १०९६/१४४३२/(४९१)/पदुम-१४ दिनांक १२ ऑक्टोबर, १९९९.
२) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक २४ ऑगस्ट, २००९

**प्रस्तावना :**

संकटकाळात मच्छिमारांना एकमेकांशी संपर्क साधणे सोपे व्हावे, त्यांना समुद्रामध्ये मासळीच्या साठ्याची योग्य माहिती मिळावी याकरीता तसेच मच्छिमारांना विशिष्ट दिशेला कमीत कमी अंतराच्य मार्गाने पोहोचण्याच्यादृष्टीने २५ टन किंवा त्यापेक्षा जास्त वजनाच्या यांत्रिक नौकांवर वॉकी टॉकी सेट, एको साऊंडर व जी.पी.एस. नेव्हीगेटर यासारखी अत्याधुनिक यंत्रसामुग्री खरेदी करण्यासाठी मच्छिमारांना अर्थसहाय्य देण्याची योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यात येत आहे. या योजनेकरीता सन २००९-१० करीता अर्थसंकल्पित असलेल्या तरतुदीपैकी रु.१ कोटी इतका निधी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. उर्वरित तरतूद वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मासेमारी नौकांवर संदेशवहन, मासळीचा शोध घेणे, इ. अत्याधुनिक यंत्रसामुग्री खरेदीसाठी अर्थसहाय्य या योजनेंतर्गत सन २००९-१० करीता अर्थसंकल्पित केलेल्या निधीतील उर्वरित रु.२० लाख इतका निधी वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे. याकरीता येणारा खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा-

मागणी क्र.डी-६
२४०५-मत्स्यव्यवसाय
१०३-सागरी मत्स्यव्यवसाय
(०२)(११) यांत्रिक नौकेवर अत्याधुनिक यंत्रसामुग्री बसविणे
राज्य योजनांतर्गत योजना
(२४०५११७१)
५२ यंत्र सामुग्री व साधन सामुग्री

या योजनेसाठी आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांना आहरण व संवितरण संनियत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हे आदेश नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९४/१०/व्यय-१, दि.३१.३.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे

हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावरुन प्रसारित करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३३१२२२९२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

**(प.श. अहमद)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती)
प्रादेशिक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई
सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय (मुंबई/ठाणे (पालघर)/रायगड (अलिबाग)/रत्नागिरी/ सिंधुदुर्ग (मालवण))
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/रायगड(अलिबाग)/रत्नागिरी/सिंधुदुर्ग(ओरोस)
उपकोषागार अधिकारी, मालवण, जि.सिंधुदुर्ग व पालघर (जि.ठाणे)
नियोजन विभाग
वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प-१५)
कक्ष अधिकारी (पदुम-१२/१३/१६), कृषि व पदुम विभाग
निवडनस्ती